**अपंग व्यक्तींच्या हक्कांचा कायदा, २०१६ मधील तरतुदीनुसार अपंगत्व संदर्भात संशोधन करण्यासाठी संशोधन समिती (Research Committee) गठित करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - अपंग - २०१७/प्र.क्र. ०५(२)/ अ.क. -२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक:- ०३.११.२०१८

वाचा - अपंग व्यक्तींच्या हक्कांचा कायदा, २०१६.

**प्रस्तावना :-**

अपंग व्यक्तींच्या हक्कांचा कायदा, २०१६ मधील कलम ६ उपकलम २ (२) अन्वये अपंगत्वावर संशोधन करण्याकरीता संशोधन समिती (Research Committee) गठित करण्याची तरतुद करण्यात आलेली आहे. त्यानुसार आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने संशोधन समिती (Research Committee) गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

अपंग व्यक्तींच्या हक्कांचा कायदा, २०१६ मधील कलम ६ उपकलम २ (२) अन्वये अपंगत्वावर संशोधन करण्याकरीता खालीलप्रमाणे संशोधन समिती (Research Committee) गठित करण्यात येत आहे.

| अ.क्र | नाव /पदनाम/ नोंदणीकृत संस्था | अपंगत्वाचा प्रकार/समितीतील पदनाम |
|---|---|---|
| १. | आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे | पदसिध्द अध्यक्ष |
| २. | उप आयुक्त, जिल्हा अपंग पुनर्वसन केंद्र, विरार, जि.पालघर | पदसिध्द सचिव |
| ३. | ॲड सुरेश जैन, विभाग प्रमुख विधी विभाग सावित्रीबाई फुले पुणे विदयापीठ, पुणे | अंध प्रवर्ग प्रतिनिधी - सदस्य |
| ४. | श्री.वसंत संख्ये | अस्थिव्यंग प्रवर्ग प्रतिनिधी - सदस्य |
| ५. | श्रीमती नंदिनी मंडलिक | कर्णबधीर प्रवर्ग प्रतिनिधी - सदस्य |
| ६. | श्री.कालिदास सुपाते | मतिमंद प्रवर्ग प्रतिनिधी - सदस्य |
| ७. | नॅशनल इन्स्टिटयुट ऑफ मेंटली हॅण्डीकॅप, मुंबई | नोंदणीकृत संस्था प्रतिनिधी - सदस्य |
| ८. | अली यावर जंग नॅशनल इन्स्टिटयूट ऑफ हेअरींग इम्पेर्ड, बांद्रा, मुंबई | नोंदणीकृत संस्था प्रतिनिधी - सदस्य |
| ९. | ऑल इंडिया इन्स्टिटयूट ऑफ फिजिकल मेडीसिन ॲण्ड रिहॅबिलिटेशन, हाजी आली, मुंबई | नोंदणीकृत संस्था प्रतिनिधी - सदस्य (अस्थिव्यंग प्रवर्ग) |
| १०. | नॅशनल असोसिएशन फॉर दि ब्लाईंड वरळी, मुंबई | नोंदणीकृत संस्था प्रतिनिधी - सदस्य (अंध प्रवर्ग) |
| ११. | संवेदना सेरेब्रल पाल्सी आत्ममग्न, बहुविकलांग सेवा केंद्र, लातूर | नोंदणीकृत संस्था प्रतिनिधी - सदस्य (मतिमंद,सेरेब्रल पाल्सी,बहुविकलांग) |
| १२. | प्रगती प्रतिष्ठाण ठाणे द्वारा संचलित मुकबधीर विद्यालय, जव्हार, ता.जव्हार,जि.पालघर | नोंदणीकृत संस्था प्रतिनिधी - सदस्य (कर्णबधीर प्रवर्ग) |

**सदर समितीची कार्ये, कार्यकाल, अधिकार खालीलप्रमाणे राहतील.**

१. सदर समितीचा कार्यकाल ५ वर्षाकरीता राहिल. तदनंतर नव्याने समिती गठित करण्यात येईल.
२. सदर समितीची बैठक ३ महिन्यातून एकदा घेणे बंधनकारक राहिल.
३. सदर बैठकीमध्ये मागील बैठकीच्या ठराव, शिफारशीच्या अनुषंगाने कार्यवाही, अपंगत्वासंदर्भात करण्यात येणा-या संशोधनावर चर्चा करुन त्यासंबधीचा प्रस्ताव शिफारशीसह शासनास सादर केला जाईल.
४. सदर समितीचा कार्यकाल ५ वर्षाकरीता विहित करण्यात आला असला तरी राजीनामा,मृत्यु किंवा इतर कारणामुळे एखादे किंवा अधिक सदस्यांची पदे रिक्त झाल्यास अशी पदे नामनिर्देशनात भरण्याबाबत शासनाचा आदेश अंतिम राहिल. मध्यावधीत नियुक्त करण्यात आलेल्या सदस्याचा कार्यकाल उर्वरित कालावधीकरीता राहिल.
५. सदर समिती सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांच्या नियंत्रणाखाली कार्यरत राहिल.
६. अपंग व्यक्तींच्या हक्कांचा कायदा, २०१६ मधील तरतूदीनुसार सदर संशोधन समिती गठीत करण्यात येत असल्यामुळे समितीतील अशासकीय सदस्यांना समितीच्या बैठकीस उपस्थित राहण्याकरीता प्रत्यक्ष वाहतुक खर्च व दैनंदिन भत्ता वित्त विभागाच्या (शासन निर्णयान्वये सुचित केल्यानुसार) प्रचलीत दराने अनुज्ञेय राहील. त्यानुसार अपंग कल्याण आयुक्तालयामार्फ़त सदर भत्ते अदा करण्यात येतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१८११०५१५०००२०६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Ashwini Bhimrao Yamgar
Date: 2018.11.05 15:06:04 +05'30'

**( अश्विनी यमगर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) सर्व मंत्री / राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, विधान भवन, मुंबई,
५) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान परिषद, विधान भवन, मुंबई,
६) मा. मुख्य सचिव यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
७) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन सर्व विभाग
८) आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) सर्व जिल्हाधिकारी,
१०) आयुक्त, सर्व महानगरपालिका,
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा,
१२) मुख्याधिकारी, सर्व नगर परिषदा,
१३) सर्व तहसिलदार,

१४) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण ,
१५) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
१६) सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, मुंबई शहर /उपनगर,
१७) सर्व गट विकास अधिकारी, पंचायत समिती,
१८) महालेखापाल, महाराष्ट्र -१ /२ (लेखा लेखापरिक्षा), मुंबई /नागपूर
१९) महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर
२०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२१) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
२२) सर्व जिल्हा कोषाधिकारी,
२३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई (५ प्रती प्रसिध्दीसाठी)
२४) निवड नस्ती, का- अ.क.२.